अध्यादेश व परिनियमांची तपासणी करण्यासाठी समिती घटीत करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**

उच्च व तंत्र शिक्षण विभाग

शासन निर्णय क्र. संकीर्ण २०११/प्र.क्र. १३६ /विशि-३

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक :- १८ जुलै, २०११.

वाचा :- १) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र.राजभ २००८/ (१२७/०८)/विशि-१ दिनांक ७ जानेवारी, २००९

२) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. युएनआय/३०२५८/२००९/विशि-१/६३१४ दिनांक ३ नोव्हेंबर, २०१०

**प्रस्तावना** :- महाराष्ट्र विद्यापीठ अधिनियम, १९९४ मधील कलम ५१ व ५३ खालील विविध खंडान्वये विद्यापीठाच्या व्यवस्थापन परिषदेला विविध परिनियम/अध्यादेश करण्याचे अधिकार आहेत. त्यानुसार राज्यातील सर्व अकृषि विद्यापीठाकडून विविध परिनियम/अध्यादेशास मंजूरी देण्याबाबतचे प्रस्ताव शासनास प्राप्त होत असतात. एखाद्या विद्यापीठाने परिनियम/अध्यादेशाव्दारे मंजूर करुन घेतलेली बाब/विषय हा अन्य विद्यापीठातील बाब/विषयाशी समान असणे आवश्यक आहे. दोन विद्यापीठातील तत्सम बाबीत असमानता निर्माण होऊ नये आणि अन्य विद्यापीठातील नियम, तरतूदी इत्यादींना बाधा येऊ नये म्हणून परिनियम/अध्यादेशांना मान्यता देण्यापूर्वी परिनियम व अध्यादेश तपासण्यासाठी प्राधिकार देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय** :-महाराष्ट्र विद्यापीठ अधिनियम, १९९४ मधील कलम ५१ व ५३ खालील विविध खंडान्वये राज्यातील सर्व अकृषि विद्यापीठाकडून प्राप्त होणा-या परिनियम /अध्यादेशांना मान्यता देण्यापूर्वी तपासणी व छाननी करुन शासनास त्याबाबत शिफारस करण्याकरिता संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे.

| अ.क्र | सदस्याचे पदनाम | पदनाम |
|---|---|---|
| १ | संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे | अध्यक्ष |
| २ | कुलसचिव, स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड | सदस्य |
| ३ | कुलसचिव, उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगांव | सदस्य |
| ४ | कुलसचिव, श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी महिला विद्यापीठ, मुंबई | सदस्य |
| ५ | प्राचार्य, प्रतिभा महाविद्यालय, चिंचवड, पुणे | सदस्य सचिव |

२. या संदर्भात संदर्भाधिन येथील अ.क्र.१ मधील शासन निर्णयातील परिच्छेद २,३,४ व ५ मधील तरतूदी जशाच्या तशा लागू राहतील.

३. समितीच्या सदस्यांना अनुज्ञेय असलेले प्रवास भत्ता व इतर अनुषंगीक भते देय राहतील.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ३५०/११/व्यय-५ दिनांक २६/५/२०११ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. हा शासन निर्णय शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०११०७११११२३५७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

( प्र. गि. कानडे )
कार्यासन अधिकारी , महाराष्ट्र शासन

प्रति,
संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
सहसंचालक, उच्च शिक्षण, पुणे विभाग, पुणे.
कुलपतींचे सचिव यांचे कार्यालय, राजभवन, मलबार हिल, मुंबई- ४०० ०३५
कुलसचिव, सर्व अकृषि विद्यापीठे,
समितीचे सर्व सदस्य (संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे) यांचे मार्फत)
सर्व सह सचिव/सर्व उप सचिव व सर्व कार्यासने, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती/विशि-३